20100827145533001

**सुधारीत विकास योजना - बीड**
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६
चे कलम ३७ (२) अन्वये मंजुरी ...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. टिपीएस ३३०८/१३६७/प्र.क्र.६४/२०१०/नवि-३०.**
**मंत्रालय, मुंबई - ३२.**
**दिनांक - २० ऑगस्ट, २०१०.**

**पहा:-** १) मुख्याधिकारी/अध्यक्ष,बीड नगर परिषद, जिल्हा बीड
यांचे पत्र क्र.बीनप/कावि/नर/२०२, दि.०२/१२/२००९.
२) संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.सु.वि.यो.बीड/ स.क्र.८३/
१३८-२०१०/ डॉ.क्र.१०५/टिपीव्ही-५/४३०९, दि. १३/०७/२०१०.

**शासन निर्णय :-** सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिद्ध करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,**

**(शिवाजी पाटणकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, बीड.
४) उपसचिव (नगर रचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद .
६) नगर रचनाकार, बीड शाखा, बीड.
(त्यांना विनंती की, मंजूर फेरबदल दर्शविणाऱ्या भाग नकाशाच्या तीन प्रती अधिप्रमाणीत करण्यासाठी शासनास सादर कराव्यात.)
७) मुख्याधिकारी, बीड नगरपरिषद, जि.बीड.
८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात औरंगाबाद विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करुन त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)
९) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)
१०) निवड नस्ती, (कार्यासन नवि-३०)

NOTIFICATION-2010.lwpF

**सुधारित विकास योजना- बीड**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम-३७[२] अन्वये मंजूरी देण्याबाबत...

**अधिसूचना**

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१०.

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६.**

**क्र. : टिपीएस ३३०८/१३६७/प्र.क्र.६४/२०१०नवि-३० :-** ज्याअर्थी बीड शहराची सुधारित विकास योजना शासनाने नगर विकास विभाग अधिसूचना क्र. टिपीएस-३३९६/प्र.क्र.१८० /नवि-९, दिनांक ८ सप्टेंबर, १९९७ मंजूर केली असून ती दिनांक १५ ऑक्टोबर, १९९७ पासून अंमलात आली आहे [यापुढे "उक्त विकास योजना" असे उल्लेखिलेली];

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत स.न. ८३(भाग) मौ.तरफगिराम यातील क्षेत्र सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात समाविष्ट आहे [यापुढे "उक्त जागा" असे उल्लेखिलेली] ;

आणि ज्याअर्थी बीड नगर परिषदेने तिच्या सर्वसाधारण सभेच्या ठराव क्र.४४/०८-०९, दिनांक ०३/१२/२००८ अन्वये उक्त जागेमधील जिल्हापरिषदेच्या मालकीची मुलांची शाळा या खालील क्षेत्र 'खेळाचे मैदान व वाहनतळ' यासाठी आरक्षित करण्याचे ठरवून तद्नुसार महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (महाराष्ट्र १९६६ चा ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला) चे कलम ३७ अन्वये फेरबदलाचे प्रस्ताव [यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे उल्लेखिलेले] आवश्यक ती वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन पत्र दिनांक ०२/१२/२००९ अन्वये शासनास मंजूरीसाठी सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेऊन व आवश्यक त्या चौकशीनंतर उपरोक्त फेरबदल प्रस्ताव मान्य करणे आवश्यक आहे असे राज्य शासनाचे मत झाले आहे ;

त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ चे उप कलम [२] अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकारांचा वापर करुन शासन उपरोक्त फेरबदल प्रस्ताव काही बदलांसह मान्य करीत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दिनांक ८ सप्टेंबर, १९९७ ची विकास योजना मंजूरीची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे -

उक्त विकास योजना मंजुरीच्या अधिसूचनेच्या शेवटच्या नोंदीनंतर पुढील नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

## नोंद

"बीड शहराच्या सुधारित विकास योजनेतील स.न. ८३ मौ.तरफगिराम (भाग) यामधील क्षेत्र सार्वजनिक निमसार्वजनिक विभागातून वगळून आ.क्र.८३ वाहनतळ (११५० चौ.मी. क्षेत्र) व आ.क्र.८४ क्रिडागण (११६०० चौ.मी.क्षेत्र) यासाठी नकाशात दर्शविल्यानूसार आरक्षित करण्यात येत आहे."

**टिप :- १)** सदरहू फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा मुख्याधिकारी, बीड नगर परिषद, जिल्हा बीड यांच्या कार्यालयांत कामकाजाच्या दिवशी अवलोकनार्थ ठेवण्यात आला आहे.

२) प्रस्तुत अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर **"www.urban.maharashtra.gov.in"** ह्या पत्त्यावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**{ शिवाजी पाटणकर }**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**Development Plan - Beed [Revised]**
Sanction under section 37[2] of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**

**Dated :- 20 August, 2010.**

***The Maharashtra Regional & Town Planning Act 1966***

**No. TPS-3308/1367/CR-64/2010/UD-30** :- Whereas the Revised Development Plan of Beed has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No.TPS-3396/CR-180/UD-9, dated 8th September, 1997 to come into force from 15th October, 1997 [hereinafter referred to as "the said Development Plan"] ;

And whereas in the said Development Plan S. No. 83(part) of Mouja Taraf-giram is shown for Public semi Public zone[hereinafter referred to as "the said land"] ;

And whereas the said Municipal Council vide its General Body Resolution No.44/08-09, dated 03/12/2008 has decided to reserve the said land for Play Ground & Parking & accordingly the said Municipal Council has submitted the Modification Proposal (hereinafter referred to as "the said Modification Proposal") to Government for sanction vide its Marathi letter dated 02/12/2009 after following all the legal procedure stipulated under section 37[1] of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 [Maharashtra XXXVII of 1966] [hereinafter referred to as "the said Act"] ;

And whereas after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune the Government of Maharashtra is of the opinion that the said Modification Proposal should be sanctioned;

Now therefore, in exercise of powers conferred under sub section [2] of section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal with some changes and for that purpose amends the above referred Notifications dated 8th September, 1997 as follows;

In the Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added;

**ENTRY**

"In the Revised Development Plan of Beed, land out of S.No. 83 Mouja Taraf-giram part is deleted from Public semi Public zone & is reserved for Site No. 83 'Parking' (area @ 1150 Sq.mt.) & is reserved for Site No.84 Play Ground (area @ 11600 Sq.mt.) as shown on the plan.

**Note:- 1)** The aforesaid part plan showing the above Modification is kept open for inspection for the public during Office hours at the office of the the Chief Officer, Beed Municipal Council, Dist. Beed.

**2)** The aforesaid Notification is available on Government Web Site @ www.urban. maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**[Shivaji Patankar]**
**Under Secretary to Government.**

NOTIFICATION-2010.lwp/F: